वदतोंहेंचितुलामी कोणअशाअव्ययातयानाशी ॥

दोहरा १७

ज्यासोंयहजगहैभयो अबिनाशीयहजान ॥
ज्याहीबिनासनकोउसके तांहीआत्मामान ॥

ओवी १७

आत्माअविनाशतुवांजाणिजे ॥ सर्वव्यापकअसेसहजे ॥
तयानाशकरूंनशकेदुजे ॥ हेंज्ञानधरूनिशोकनकरी ॥

अभंग १७

नाशारहितजाणातेंची ॥ जगव्यापीसत्तात्याची ॥ १ ॥
वार्त्तातयाचीकोणाला ॥ नसेठाउकीजनाला ॥ २ ॥
त्याचानाशयाजीवानें ॥ नव्हेकोटीहीसाधनें ॥ ३ ॥
मगशोकअविनाशाचा ॥ तुकाह्मणेमिथ्यावाचा ॥ ४ ॥

श्लोक १८

अंतवंतइमेदेहानित्यस्योक्ताःशरीरिणः ॥
अनाशिनोऽप्रमेयस्यतस्माद्युद्ध्यस्वभारत ॥

समश्लोकी १८

देहनश्वरज्याजीवा बोलिलाअंशनित्यतो ॥
अनाशीअप्रमेयाचा भांडियास्तवभारता ॥

आर्या १८

अविनाशीजीवाचा होयतनूलागिभारतामरण ॥
यास्तवकुंतीतनया तूंकरिपार्थास्वधर्मकामरण ॥

दोहरा १८

अंतवंतसबदेहमों जीवरहतहैनीत ॥
अबिनाशीयहजुहै जुद्धकरोतोनीत ॥

## ओंवी १८

देहतंवनाशवंत ॥ आत्मानाशरहित ॥
ज्यासिअज्ञानह्मणिजेत ॥ पार्थाऊठयुद्धासी ॥

## अभंग १८

देहनाशवंतपुरे ॥ जीवज्ञानसाचोखारे ॥ १ ॥
अंशब्रह्मीचातोनित्य ॥ नव्हेकधींहीअसत्य ॥ २ ॥
अविनाशीअप्रमेय ॥ जाणुनियुद्धकरीस्वयें ॥ ३ ॥ ॥
तुकाह्मणेहाविकल्प ॥ धरिल्याबाधीलगापाप ॥ ४ ॥

## श्लोक १९

यएनंवेत्तिहंतारंयश्चैनंमन्यतेहतम् ॥
उभौतौनविजानीतोनायंहंतिनहन्यते ॥

## समश्लोकी १९

भेदवादीह्मणेमारी चार्वाकह्मणतोमरे॥
दोघेहीनेणतीआत्मा नहामारीनहामरे ॥

## आर्या १९

आत्मावधीह्मणेजो आणिवदेजोवधोनिहीतोघे ॥
नवधीनमरेआत्मा करितीअध्यासमूर्खतेदोघे ॥

## दोहरा १९

जोयाकोहंतागने हनोगमेजोकोय ॥
यहनमारेमरेनही अग्यानीवोदोय ॥

## ओंवी १९

ऐसेह्मणतीहामारितो ॥ दुसराह्मणेहामारवितो ॥
दोघेनेणतीकोणमारितो ॥ मारणेंमरणेंअसेना ॥

## अभंग १९

भेदवादीयांचेंमत ॥ मारील्मणतीतेनेमांत ॥ १ ॥
चार्वाकाचेंज्ञानखोटें ॥ मेलेह्मणतीअवचटे ॥ २ ॥
परीनेणतीदोंघेही ॥ नतोमारीह्मणेकांहीं ॥ ३ ॥
तुकाविनवीतोसंतां ॥ चित्तदेणेंअपूर्वता ॥ ४ ॥

## श्लोक २०

नजायतेम्रियतेवाकदाचिन्नायंभूत्वाभवितावानभूयः॥
अजोनित्यःशाश्वतोऽयंपुराणोनहन्यतेहन्यमानेशरीरे॥

## समश्लोकी २०

नव्हाहोतोमरतोवाकधींही देहासंगेंहोउनीहोतनाहीं ॥
अजानित्याशाश्वतायापुराणा देहादृश्यामारितांमारवेना ॥

## आर्या २०

आत्मानहोयनमरे नकधींहोवोनिमागुताहोतो ॥
शाश्वतपुराणअजजो नमरेमरतांशरीरआहोतो ॥

## दोहरा २०

यहनमरेउपजेनहि भयोनआगेहोय ॥
अजपुरातननित्यहै मारेमरेनसोय ॥

## ओवी २०

आत्मानाशरहित ॥ उपजोंनलाहेनिश्चित ॥
हाअजनित्यपुराणशाश्वत ॥ यासनाशनाहींसर्वथा ॥

## अभंग २०

नव्हेजन्मचीजयासी ॥ तयामृत्युकेवींयासी ॥ १ ॥
कधींदेहाचेसंगती ॥ नेणेयेणेजाण्याप्रती ॥ २ ॥

देहासंगेंअसतांनाहीं ॥ हेंचित्याचेंनवलपाहीं ॥ ३ ॥
अजनित्यशाश्वततो ॥ देहेंदृश्येंगवसेनातो ॥ ४ ॥
मारितांहीमारवेना ॥ तुकाह्मणेयापुराणा ॥ ५ ॥

## श्लोक २१

**वेदाविनाशिनंनित्यंयएनमजमव्ययम् ॥**
**कथंसपुरुषःपार्थकंघातयतिहंतिकम् ॥**

## समश्लोकी २१

पूर्वोक्तलक्षणींयातें जाणतोपुरुषस्वयें ॥
प्रकृतीवेगळाकोणा मारीवामारवीकसा ॥

## आर्या २१

अजअव्ययअविनाशी आत्माऐसेंमनांतचिविचारी ॥
मगतोपुरुषकसारे पार्थाकोणासिमारवीमारी ॥

## दोहरा २१

जोजानतहैआतमा अव्ययऔरअविनाश ॥
सोनहिंमरेमारनसके अबिकारीअबिनाश ॥

## ओवी २१

आत्माजाणअविनाश ॥ अव्ययह्मणतीतयास ॥
अर्जुनाऐशियाजीवास ॥ कवणमारूंशके ॥

## अभंग २१

पूर्वोक्तयाच्यालक्षणा ॥ पुरुषजाणेविचक्षणा ॥ १ ॥
येऱ्हवींयाप्रकृतीला ॥ मारीकोणवेगळाला ॥ २ ॥
मारितोकैसांआतां ॥ तुकाविनवीतोश्रोतां ॥ ३ ॥

## श्लोक २२

**वासांसिजीर्णानियथाविहायनवानिगृह्णातिनरोपराणि ॥**

तथाशरीराणिविहायजीर्णान्यन्यानिसंयातिनवानिदेही॥

## समश्लोकी २२

वस्त्रेंजुनींटाकुनिजेंविदेतो शरीरधारीनविंअन्यघेतो ॥
कलेवरेंटाकुनिजीवजीर्णें घेतोनवींअन्यअनेकवर्णें ॥

## आर्या २२

जैसानरकौंतेया नूतनघेतोत्यजोनिजीर्णपट ॥
तैसादेहनवाघे देहीहीटाकुनीजुनानिपट ॥

## दोहरा २२

जैसेपटजीरनतजे पहिरतनरजुनबीन ॥
देहपुरानजीवतजे धरीयतनईपरवीन ॥

## ओवी २२

जीर्णझालियावरी ॥ परीधाननवींकरी ॥
कलेवरत्यजुनीधरी ॥ देहीअन्य ॥

## अभंग २२

वस्त्रेंजुनीत्यागुनियां ॥ नवींघेणेंपांघरावया ॥ १ ॥
शरीराचेतेचभावें ॥ येथेंचैतन्येंवागावें ॥ २ ॥
जीर्णदेहत्यागेदुजा ॥ तुकाह्मणेयाचकाजा ॥ ३ ॥

## श्लोक २३

नैनंछिंदंतिशस्त्राणिनैनंदहतिपावकः॥
नचैनंक्लेदयंत्यापोनशोषयतिमारुतः॥

## समश्लोकी २३

यालानतोडितीशस्त्रें यालाअग्नीनजाळिही ॥
नपाणीभिजवीयाला नकरीशुष्कवायुही ॥

## आर्या २३

शस्त्रेंछिन्नन्व्हेहा आत्मातिसाचपावकेंनजळे ॥
नकरीशुष्कहिवायू करवेनाआर्द्रहीतयासजळें ॥

## दोहरा २३

यहनकटेहथियारसो पावकसकेनहिजारी ॥
भीजसकेजलताहिने सोकनसकेबतयारी ॥

## ओवी २३

शस्त्रीनतुटेकांहीं ॥ अग्नीनजाळीपाही ॥
जळबुडविणारनाहीं ॥ वायूच्यानेंनशोषवे ॥

## अभंग २३

यालानतोडितीशस्त्रें ॥ वन्हीजाळीनाशिखायें ॥ १ ॥
नपाणीबुडवीयासी ॥ वायुनउडवीबळेंसी ॥ २ ॥
शुष्कवातेंअणुगर्भू ॥ हातोनित्यचस्वयंभू ॥ ३ ॥
सत्तामात्रेंयानिराळा ॥ तुकाह्मणेधन्यकळा ॥ ४ ॥

## श्लोक २४

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्यएवच ॥
नित्यःसर्वगतःस्थाणुरचलोऽयंसनातनः ॥

## समश्लोकी २४

छेदादाहानहायोग्य शोषायाभिजवावया ॥
नित्यसर्वांतजोस्तब्ध जोशाश्वतअचंचल ॥

## आर्या २४

अच्छेद्यअदाह्यपुरुष कितितुजउघडोनिसांगबावरणूं ॥
अक्लेद्यअशोष्यतसा नित्याचळआद्यसर्वगावरणू ॥

## दोहरा २४

कटेजरेसूखेनही औरनभिजनजोग ॥
सदारहेसबठौरथिर अविनाशिबिनरोग ॥

## ओवी २४

नबुडेनतुटेशोषे ॥ जीवव्यापूनिअसे ॥
स्थाणुवतअचळदिसे ॥ परिपूर्णभरला ॥

## अभंग २४

छेदावयानहायोग्य ॥ यत्नअग्नीचाअयोग्य ॥ १ ॥
नसेसुकलाहाकधीं ॥ भिजलानाहींकायबाधी ॥ २ ॥
स्थाणुपरीस्थिरसर्वी ॥ नित्याचळभरलीउर्वी ॥ ३ ॥
अचंचळरूपज्याचें ॥ तुकयाध्यानलागेत्याचें ॥ ४ ॥

## श्लोक २५

अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ॥
तस्मादेवंविदित्वैनंनानुशोचितुमर्हसि ॥

## समश्लोकी २५

नचिंतवेनिराकारा बोलिलानिर्विकारहा ॥
याकारणेंयासिअसें जाणशोकनकोकरूं ॥

## आर्या २५

अव्यक्ताचिंत्यपुरुष, अविकारीवदतिजाणसुश्लोक ॥
जाणुनियास्तवऐसें नकरीपार्थाकदापितूंशोक ॥

## दोहरा २५

प्रगटनहींजूअचिंत्यहै अबिकारीतूंजान ॥
ऐसेजाकोंजानिके सोकलोहिजनमान ॥

## ओवी २५

नकळेचित्तींनयेअव्यक्तीं ॥ तयासिअविकार्यह्मणती ॥
ऐसेंजाणोनितूंकिती ॥ वृथाशोककरितोसी ॥

## अभंग २५

ज्यासीआकारचिनाहीं ॥ त्याचेंचिंतननतेंकायी ॥ १ ॥
जेथेंद्वैतहेंशीरेना ॥ निर्विकारहेंचिजाणा ॥ २ ॥
त्याकारणेंयासिअसे ॥ शोकनधरीमानसें ॥ ३ ॥
केलाशोकफळकाय ॥ तुकाह्मणेवायांजाय ॥ ४ ॥

## श्लोक २६

अथचैनंनित्यजातंनित्यंवामन्यसेमृतम् ॥
तथाऽपित्वंमहाबाहोनैनंशोचितुमर्हसि ॥

## समश्लोकी २६

आतांदेहासवेंहोतो मरतोजरिमानिसी ॥
तरींतूंजमहाबाहो याशोकासिनयोग्यता ॥

## आर्या २६

नित्यमरेजन्मेतो जीवअसेमानिसीजरीथोक ॥
हेविजयमहाबाहो नकरीचित्तींतथापितूंशोक ॥

## दोहरा २६

जोतूंजानतजीवकों जनममरणपुनिहोय ॥
तउसोकतुजिनकरे मनदृढतामेजोय ॥

## ओवी २६

जीवनउपजेननाशे ॥ हेंतुलाज्ञानअसे ॥
अर्जुनाजाणोनिऐसें ॥ शोकासिकायकारण ॥

## अभंग २६

आतांदेहासवेंहोतो ॥ जरीमरतोमानिशी ॥ १ ॥
तरीतुजमहाबाहो ॥ शोकयहोनसावा ॥ २
सर्वजाणतयांच्याराया ॥ पाहेहृदयांशोधोनी ॥ ३ ॥
तुकाह्मणेकृपावंता ॥ दासचितातुजआहे ॥ ४ ॥

## श्लोक २७

जातस्यहिध्रुवोमृत्युर्ध्रुवंजन्ममृतस्यच ॥
तस्मादपरिहार्येऽर्थेनत्वंशोचितुमर्हसि ॥

## समश्लोकी २७

जोझालात्यासिमरण मेल्याजन्महिनिश्चित ॥
परिहारनसेज्याला त्याशोकाशिनयोग्यतूं ॥

## आर्या २७

झालानिश्चितमरतो निश्चितमेलाहिजन्मतोलोक ॥
नटळेहेंकोणाशीं यास्तवनकरीकदापितूंशोक ॥

## दोहरा २७

जोउपजेसोबिनासहै मरेसोउपजेआय ॥
होनहारसोहोतहै ताहिनसोकबढाय ॥

## ओवी २७

उपजलियासमृत्यू ॥ मेलियासजन्मसत्यू ॥
हाऐसाअपरिहार्यू ॥ शोकनकरीमानसीं ॥

## अभंग २७

जन्माआलियामरण ॥ टाळीकोणअर्जुना ॥ १ ॥
मृत्युपाठिलागेजन्म ॥ कोणनेमढांसळी ॥ २ ॥

परिहाराजेविरहित ॥ नेदीचित्तत्याशोकीं ॥ ३ ॥
तुकाह्मणेजेअयोग्य ॥ होयभोग्यकोठोनी ॥ ४ ॥

## श्लोक २८

अव्यक्तादीनिभूतानिव्यक्तमध्यानिभारत ॥
अव्यक्तनिधनान्येवतत्रकापरिदेवना ॥

## समश्लोकी २८

भूतांचीआदिअव्यक्तीं मध्येंहीव्यक्तदीसती ॥
अव्यक्तींचलयाजाती त्याचातोखेदकांपरी ॥

## आर्या २८

मायेपासुनिसुटती भूतेंतीमाजिमागुतींदडती ॥
मध्येंउगींचदिसती यासाठींसुज्ञकोणतेरडती ॥

## दोहरा २८

पाछोजाइनजाइये आगेखरेनजान ॥
माझहिकछुनदेखिये ताकोंसोकनमान ॥

## ओवी २८

प्रकृतीपासोनिहोती ॥ मरणपर्यंतदीसती ॥
मागुतींप्रकृतींसामावती ॥ हाशोकतुजअयोग्य ॥

## अभंग २८

भूतजातिआदिएक ॥ प्रकाशकअव्यक्त ॥ १ ॥
मध्यव्यक्तयाचाभाव ॥ जोस्वभावमृगजळीं ॥ २ ॥
लयअव्यक्तींनेमिला ॥ खेदआलातुजकैसा ॥ ३ ॥
उगीत्याचित्तवेदना ॥ तुकयाध्यानातेंनये ॥ ४ ॥

## श्लोक २९

*आश्चर्यवत्पश्यतिकश्चिदेनमाश्चर्यवद्वदतितथैवचान्यः॥
आश्चर्यवच्चैनमन्यःशृणोतिश्रुत्वाप्येनंवेदनचैवकश्चित् ॥

## समश्लोकी २९

आश्चर्यवत्पाहतियासिकोणी आश्चर्यवद्बोलतिएकवाणी ॥
आश्चर्यवत्ऐकतिएककानीं कोणीअहोनेणतिआइकोनी ॥

## आर्या २९

आश्चर्यापरिकोणी ऐकुनिनेणेतसाचिबापाहे ॥
कोणीऐकुनिनेणे आत्म्याशींजाणतीनबापाहे ॥

## दोहरा २९

जोयाकोदेखतकहे सोउअचरजभाय ॥
सुनेअचंबोसोलगे यहजानोनहिजाय ॥

## ओवी २९

आश्चर्यरूपकोणीदेखती ॥ आश्चर्यकोणीबोलतीऐकती ॥
आइकोनिविसरती ॥ आश्चर्यथोर ॥

## अभंग २९

कोणीपाहतीआश्चर्यें ॥ निजधर्मैंसाटोपें ॥ १ ॥
कोणीआश्चर्यातेंबोले ॥ निकेभलेमनदेती ॥ २
कोणीआश्चर्यंयाऐके ॥ वार्त्तापिकेमोक्षाची ॥ ३ ॥
कोणीनेणतीऐकोनी ॥ ऐसीकाहणीह्मणेतुका ॥ ४ ॥

## श्लोक ३०

देहीनित्यमवध्योऽयंदेहसर्वस्यभारत॥
तस्मात्सर्वाणिभूतानिनत्वंशोचितुमर्हसि॥

## समश्लोकी ३०

देहधारीनहावध्य सर्वदेहांतभारता ॥
भूतेंतोंनश्वरेंतस्मात् त्याच्याशोकानयोग्यतूं ॥

## आर्या ३०

देहीसकळांच्याहो पार्थादेहींअवध्यहेंशोक ॥
यास्तवभूतांविषयीं नकरीसखयामनांततूंशोक ॥

## दोहरा ३०

जीवनमारोजातहै बसतसबसनकेदेह ॥
तातेंशोकनकीजीये करिकाहूसेंनेह ॥

## ओवी ३०

देहीनित्यवंतपाही ॥ जीववधिलानवचेकांहीं ॥
हासर्वभूतांचेठायीं ॥ वृथाशोककरूंनको ॥

## अभंग ३०

देहधारीनहाबद्ध ॥ जोअबद्धयमासी ॥ १ ॥
सर्वदेहांतभारता ॥ पूर्णसत्ताचिन्मय ॥ २ ॥
भूतेंतरींनाशवंत ॥ खेदकरीतकशाचा ॥ ३ ॥
नव्हेसिअर्जूनातूंयोग्य ॥ भवअरोग्यतुकया ॥ ४ ॥

## श्लोक ३१

स्वधर्ममपिचावेक्ष्यनविकंपितुमर्हसि ॥
धर्म्याद्धियुद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्यनविद्यते ॥

## समश्लोकी ३१

स्वधर्मपाहुनीकंपा करायासिनयोग्यतूं ॥
धर्मयुद्धाहुनीश्रेय क्षत्रियांसनआणिखी ॥

## आर्या ३१

निजधर्माविरिदृष्टी देउनिपार्थाभिऊंनकोयुद्धा ॥
युद्धाविणतोक्षत्रिय नपवेकल्याणहेधरीश्रद्धा ॥

## दोहरा ३१

आपनोधर्मबिचारतूं जिनसोंछोडसंग्राम ॥
धर्मजुद्धतेंक्षत्रियहै औरनकछुअभिराम ॥

## ओवी ३१

स्वधर्मजाणशीजरी ॥ भयासिनव्हसीअधिकारी ॥
धर्मयुद्धाहूनिश्रेयतरी ॥ क्षत्रियांअधिकनसे ॥

## अभंग ३१

स्वधर्मपाहोनिकृपा ॥ आलीबापायेवेळें ॥ १ ॥
तरिहेंयोग्यनव्हेदया ॥ पतनींकायाघालील ॥ २ ॥
धर्मयुद्धारेवांचुनी ॥ श्रेययेस्थानींदिसेना ॥ ३ ॥
क्षत्रियाचेक्षात्रधर्म ॥ तुकावर्मनिवेदी ॥ ४ ॥

## श्लोक ३२

यदृच्छयाचोपपन्नंस्वर्गद्वारमपावृतम् ॥
सुखिनःक्षत्रियाःपार्थलभंतेयुद्धमीदृशम् ॥

## समश्लोकी ३२

प्रार्थिल्यावीणजेंझालें स्वर्गाचेंद्वारऊघडें ॥
सुखीनिर्भयतेऐसे युद्धक्षत्रियलाधती ॥

## आर्या ३२

आयासाविणमिळतां स्वर्गाचेंद्वारयुद्धहेंउघडें ॥
मानावेंसौख्यमनीं पार्थाक्षत्रियजनेंमहासुघडें ॥

## दोहरा ३२

आपनीइच्छातेलह्यो खुलोस्वर्गकोद्वार ॥
भागवतक्षत्रियलहे ऐसोरणयाबार ॥

## ओवी ३२

देवह्मणेपार्थासी ॥ देवेंआणिलारणासी ॥
मुक्तस्वर्गद्वारासी ॥ युद्धींक्षत्रियांलाभू ॥

## अभंग ३२

अजिल्यावीणझालेंहें ॥ पुरत्यापाहेदृष्टीनें ॥ १ ॥
द्वारउघडेंस्वर्गाचें ॥ भाग्यसाचेंह्मणोनी ॥ २ ॥
सुखीनिर्भयतेऐसें ॥ क्षत्रियहर्षेरणांगणीं ॥ ३ ॥
लाभह्मणेतुकयाला ॥ हाचआलाजन्माचा ॥ ४ ॥

## श्लोक ३३

अथचेत्त्वमिमंधर्म्यंसंग्रामंनकरिष्यसि ॥
ततःस्वधर्मंकीर्तिंचहित्वापापमवाप्स्यसि ॥

## समश्लोकी ३३

आतांयाधर्मयुद्धातें करीनासचितूंजरी ॥
तरीस्वधर्मकीर्त्तीतें टाकूनीपापपावसी ॥

## आर्या ३३

आतांस्वधर्मअपुला यासंग्रामानआजिआदरितां ॥
धर्माच्यानाशातें कीर्त्तीच्याकरुनिपावशीदुरितां ॥

## दोहरा ३३

औरधर्मसंग्रामकों जातूंकरयेनही ॥
तजकेंकीरतधर्मकी पडिहैपापनमाही ॥

## ओवी ३३

आपलास्वधर्मसांडोनी ॥ संग्रामनकरिसीरणीं ॥
उत्तमश्रेयहारवूनी ॥ पावसीपापातें ॥

## अभंग ३३

आतांयाचधर्मयुद्धीं ॥ दृढबुद्धिसोडिली ॥ १ ॥
नभांडेनह्मणोनियां ॥ छंदवायांघेतला ॥ २ ॥
तरीसत्कीर्त्तिजाउनी ॥ निंदाजनींपावसी ॥ ३ ॥
तुकाह्मणेआनंदती ॥ पापहातींधरलिया ॥ ४ ॥

## श्लोक ३४

अकीर्त्तिचापिभूतानिकथयिष्यंतितेऽव्ययाम् ॥
संभावितस्यचाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥

## समश्लोकी ३४

अपकीर्त्तितुझीलोक आचंद्रार्कहिवर्णिती ॥
दुष्कीर्तिमान्यपुरुषां मरणाहूनिवाइट ॥

## आर्या ३४

शाश्वतपार्थातूझी भूतेंहींवर्णितीलअपकीर्त्ति ॥
संभावितासिअपयश मरणाधिकजाणदेतसेअंतीं ॥

## दोहरा ३४

सबलोककहेअबेते अपजसबढाय ॥
अपजसप्रतिष्ठावंतकूं मरणहुतेंअधिकाय ॥

## ओवी ३४

अधर्मअपकीर्त्ति ॥ लोकनिंदाबोलती ॥
तुझेशत्रुहांसती ॥ तेंमरणातुल्य ॥

## अभंग ३४

तुझीअपकीर्त्तीलोक ॥ हेचंद्रार्कवाणीती ॥ १ ॥
पुरुषजोकीर्त्तिमान्य ॥ त्याअमान्यहेगोष्टी ॥ २ ॥
मरणबरेंएकवेळां ॥ परीजिव्हाळाहाखोटा ॥ ३ ॥
तुकाह्मणेयेथेंनिग्र ॥ तेथेंबंधहोईना ॥ ४ ॥

## श्लोक ३५

भयाद्रणादुपरतंमंस्यंतेत्वांमहारथाः
येषांचत्वंबहुमतोभूत्वायास्यसिलाघवम् ॥

## समश्लोकी ३५

भयेंरणांतुनीगेला ह्मणतीलमहारथी॥
मान्यहोऊनिहीयांतें पावसीबहुलाघव ॥

## आर्या ३५

पार्थामहारथीहे ह्मणतिलतुजलारणासिहाभ्याला ॥
ज्यांसीमान्यसदातूं भासेललघुत्वयांचिसभ्यांला ॥

## दोहरा ३५

भयतेंअर्जुनरणतजो यौंकहीयेबीर ॥
तोहीबहुतकरमानतहै अबलघुकहिहेधीर ॥

## ओवी ३५

भयेंकरूनिपरतसी ॥ हेंकळेलरथियांसी ॥
शूरींथोरपणपावलासी ॥ तेथेंपावसीअपमान ॥

## अभंग ३५

भयेंगेलारेपळाला ॥ पार्थभ्यालाआलासी ॥ १ ॥
ह्मांसतीलमहारथी ॥ अर्थस्वार्थीनाडूहा ॥ २॥

महारथीनामतूझें ॥ सांडिलबोझेंत्रीदाचें ॥ ३ ॥
तुकायाचपंथेंमान्य ॥ घेसीअन्यलाघव ॥ ४ ॥

## श्लोक ३६

अवाच्यवादांश्चबहून्वदिष्यंतितवाहिताः ॥
निंदंतस्तवसामर्थ्यंततोदुःखतरंनुकिम् ॥

## समश्लोकी ३६

बोलोंनयेतितेबोल बोलतीबहुशत्रुहे ॥
सामर्थ्यनिंदितीतूझें त्याहुनीदुःखकोणतें ॥

## आर्या ३६

बोलूंनयेचिजेंतें पार्थातुजबोलतीलरिपुदुष्ट ॥
निंदितितवसामर्थ्या याहुनिआणीककोणतेकष्ट ॥

## दोहरा ३६

तेरेअरिसबकहेजो अनकहनीबात ॥
नीजथाडीयाहिकीसुने वहेदुःखलागतनात ॥

## ओवी ३६

बोलोंनयेतेंबोलती ॥ तवसामर्थ्यवैरीनिंदिती ॥
लाजहोईलक्षिती ॥ हेंमोठेंदुःख ॥

## अभंग ३६

बोलोंनयेतेतेबोल ॥ शस्त्रेंबोलभेदिती ॥ १ ॥
बहुरिपुपार्थातुज ॥ देतीलाजमनस्वी ॥ २ ॥
प्रतापतोनिखंडुनी ॥ विटंबणीचाळीती ॥ ३ ॥
दुःखकोणत्यापरतें ॥ जेंतुकयातेंसुखदे ॥ ४ ॥

## श्लोक ३७

हतोवाप्राप्स्यसिस्वर्गंजित्वावाभोक्ष्यसेमहीम् ॥

तस्माद्‌उत्तिष्ठकौंतेययुद्धायकृतनिश्चयः॥

## समश्लोकी ३७

मेलियापावसीस्वर्ग जिकिल्याराज्यभोगिसी ॥
यालागिंऊठकौंतेया करूनीयुद्धनिश्चय ॥

## आर्या ३७

मरसिलतरिस्वर्गमिळे जिकिशितरिभोगिशीलहेधरणी ॥
यास्तवऊठसख्यातूं होदृढनिश्चयधरूनिसिद्धरणीं ॥

## दोहरा ३७

लरतमरेलहिहेस्वर्ग जितेयहमहिभोग ॥
ऊठअर्जुनतूंजुद्धकर यहिजेतोकोंजोग ॥

## ओवी ३७

मेलियास्वर्गप्राप्ती ॥ वांचल्याहोसीलपृथ्वीपती ॥
हेंधरूनियांचित्तीं ॥ युद्धालागींऊठिगा ॥

## अभंग ३७

मेल्यायेथेंस्वर्गवास ॥ हातोमोडिलाउल्हास ॥
आलावांटास्वकर्मास ॥ तोकोणासभंगेना ॥ १ ॥
नाहींतरीभुजातेजें ॥ जिकिलियाकुरूराजे ॥
भूमंडळीचेंभोगीजे ॥ सर्वसुखनित्यानी ॥ २ ॥
ययालागींशोकत्यागी ॥ उठेधैर्यबळेंअंगीं ॥
झुंझाचियेसेलभागी ॥ अधिकारीतूंहोई ॥ ३ ॥
तुकाह्मणेभूमिभार ॥ उतरावाहानिर्धार ॥
यास्तवअनुभवसार ॥ देवोत्यासनिवेदी ॥ ४ ॥

## श्लोक ३८

सुखदुःखेसमेकृत्वालाभालाभौजयाजयौ॥

ततोयुद्धाययुज्यस्वनैवंपापमवाप्स्यसि ॥

## समश्लोकी ३८

लाभालाभसुखेंदुःखें जयापजयहेसम ॥
मानूनिकरितूंयुद्ध याणेंपापनपावसी ॥

## आर्या ३८

करुनिसमानजयाजय लाभालाभाससौख्यसंतापा ॥
मगकरियोगरणाचा येणेंपार्थानपावसीपापा ॥

## दोहरा ३८

लाभहानिसुखदुःखऔर जीतेहारिसमान ॥
तातेअर्जुनजुद्धकर पापलेहिजिनमान ॥

## ओवी ३८

सुखदुःखसमकरूनी ॥ लाभअलाभनधरीमनीं ॥
अजयोजयोसांडुनी ॥ युद्धकरितांपातनाहीं ॥

## अभंग ३८

प्रीतिधरिल्याजेपावे ॥ सुखतेथेंगासंभवे ॥
विषयवियोगींहेलावे ॥ दुःखार्णवलहरी ॥ १ ॥
दोहींसमबुद्धीधरी ॥ लाभालाभतपासरी ॥
मगंतूंसुखेंयुद्धकरी ॥ पापमाथाआदळेना ॥ २ ॥
निर्विकल्पतोनिःसंगु ॥ निःसंगीचअनुभवु ॥
तुकाह्मणेचांगू ॥ निजमोक्षआतुडे ॥ ३ ॥

## श्लोक ३९

एषातेऽभिहितासांख्येबुद्धियोगेत्विमांशृणु ॥
बुद्ध्यायुक्तोययापार्थकर्मबंधंप्रहास्यसि ॥

## समश्लोकी ३९

सांख्यहेंबोलिलोंयुद्धीं योगाचीबुद्धिआइक ॥
ज्याकर्मयोगबुद्धीनें कर्मबंधासितोडिशी ॥

## आर्या ३९

कथिलीसांख्याविषयीं यापरिमीसांगतोंमतीपरिस ॥
जीकर्मबद्धनकरी कोणदुजीश्रेष्ठयुक्तियापरिस ॥

## दोहरा ३९

सांख्यबुद्धीतोसोंकही कहतजोगविधितोय ॥
ताबुद्धिकेंसंजोगतें रहेनकर्मनमोय ॥

## ओवी ३९

बुद्धीसांख्यमतीची ॥ सांगेनतुलामुळींची ॥
तेणेंतुटतीलभवबंधाचीं ॥ कर्मबंधनें ॥

## अभंग ३९

बोलिलोंयेथेंअर्जुना ॥ सांख्यबुद्धीहेचीजाणा ॥
सर्वांविशींतूंदेखणा ॥ हितघेईआपुलें ॥ १ ॥
योगींबुद्धीधनुर्धरा ॥ जींतबहुतसेविचारा ॥
त्यांतदेईकर्णद्वारा ॥ जेंस्वहितसर्वांचें ॥ २ ॥
अहोप्रत्यक्षकर्मयोगें ॥ योगींरचाअंतरंगें ॥
धुवगनेघेणेजग ॥ तारावयाबुद्धीतें ॥ ३ ॥
आतातिच्यासंगतीनें ॥ कर्मबंधेंमुक्तहोणें ॥
तुकाह्मणेसांवधपणें ॥ बुद्धिवंतेंऐकावी ॥ ४ ॥

## श्लोक ४०

नेहाभिक्रमनाशोऽस्तिप्रत्यवायोनविद्यते॥

स्वल्पमप्यस्यधर्मस्यत्रायतेमहतोभयात्॥

## समश्लोकी ४०

विघ्नेंअपूर्णतायेथें नसेनप्रत्यवायही ॥
नाशीथोराभयातेंही स्वल्पईश्वरिंअर्पितां ॥

## आर्या ४०

जेथेंअनुक्रमाचा ननाशहिप्रत्यवायहीकाहीं ॥
स्वल्पहिधर्मपहाहा राखीवारुनिभयाअनेकांहीं ॥

## दोहरा ४०

कर्मकरेबिनबासना तांकोंहोयबिनास ॥
अल्पकरेजूधर्मयह काटतभवभयफास ॥

## ओवी ४०

निष्कामकर्मकरणें ॥ प्रत्यवायनव्हेबोलणें ॥
थोडियाधर्मातेंनिकरणे ॥ महाभयेंतरशील ॥

## अभंग ४०

विघ्नेंछळितांपूर्ण ॥ दिसोयेतेंयेथेंगौण ॥
मिथ्याप्रत्यवायपण ॥ नास्तिकत्वेंउडेल ॥ १ ॥
महाभयातेंहीनाशी ॥ भूतांजेविंदेवलसी ॥
कीजेस्वल्पईश्वरासीं ॥ अर्पिल्याचेंहेंफळ ॥ २ ॥
तुकाह्मणेदीनानाथ ॥ हीनदीनपाहुनिपार्थ ॥
दयाकरोनिपरमार्थ ॥ हातींत्याच्यादेतसे ॥ ३ ॥

## श्लोक ४१

व्यवसायात्मिकाबुद्धिरेकेहकुरुनंदन॥
बहुशाखाह्यनंताश्चबुद्धयोऽव्यवसायिनाम्॥

## समश्लोकी ४१

निश्चयाचीबुद्धिएक यामार्गीकुरुनंदना ॥
बहुशाखाअशाबुद्धी अनंताकामुकाचिया ॥

## आर्या ४१

व्यवसायात्मिकबुद्धी धरिपार्थाएकतूंअविच्छिन्न ॥
अव्यवसायीजेनर त्यांच्याबुद्धीअनंतहीभिन्न ॥

## दोहरा ४१

बुद्धिजोनिश्चयवंतकों एकहेतुकेजान ॥
जिनकोनिश्चयनाहिने तिनहुंबहुबिधमान ॥

## ओवी ४१

बुद्धिनिश्चयात्मिक ॥ यालागींबुद्धिएक ॥
बहुभाष्यबुद्धिदेख ॥ कामुकाचिया ॥

## अभंग ४१

निश्चयाचीऐकबुद्धी ॥ जेकाबारकउपाधी ॥
ययामार्गामधीं ॥ ऐककुरुनंदना ॥ १ ॥
बहुशाखाभवरुखा ॥ छायाशीतळस्वात्मिका ॥
जेतेअनंतकामुका ॥ बुजवणीजाहाली ॥ २ ॥
तुकाह्मणेबुद्धियोगें ॥ साधकतरतीनिजांगें ॥
कोणीकुबुद्धीकुसंगें ॥ प्राणीमात्रबुडाले ॥ ३ ॥

## श्लोक ४२

यामिमांपुष्पितांवाचंप्रवदंत्यविपश्चितः॥
वेदवादरताःपार्थनान्यदस्तीतिवादिनः॥

## समश्लोकी ४२

श्रुतींतस्वर्गजोपुष्प मुखतेंफलमानिती ॥

तेवेदवादींचरत नाहींह्मणतिआणिखी ॥

## आर्या ४२

अज्ञानीजेमानव पुष्पितवाणीचहेतयांमान्य ॥
जेवेदवादरतते ह्मणतीनाहींचयाविनाअन्य ॥

## दोहरा ४२

वेदहिमानतस्वर्गफूल तेअग्यानीहोय ॥
कहतजुहैकछुऔरनहि तिनमेंग्याननहोय ॥

## ओवी ४२

वेदवाचापुष्पित ॥ स्वर्गफूलत्याजावेंसांगत ॥
अज्ञियावसेनिश्चित ॥ फलटाकूनिकर्मकरी ॥

## अभंग ४२

मूढउद्बोधनींप्रीती ॥ वेदींगर्जिन्नल्याश्रुती ॥
साधनयोगाच्याहातीं ॥ स्वर्गफूलअर्पीती ॥ १ ॥
चाळवलेबहुगेले ॥ मुर्खीफळतेंमानिलें ॥
तेवेदवादींरतले ॥ नाहींपाहिलेअनुभव ॥ २ ॥
स्वर्गापरतेंनाहींसुख ॥ ऐसेपावलेमूढदेख ॥
तूकादेवापासींसुख ॥ अक्षयाचेंमागत ॥ ३ ॥

## श्लोक ४३

कामात्मानःस्वर्गपराजन्मकर्मफलप्रदाम् ॥
क्रियाविशेषबहुलांभोगैश्वर्यगतिंप्रति ॥

## समश्लोकी ४३

इच्छितीस्वर्गपरजे जन्मकर्मफलप्रदा ॥
बहुकर्मद्रव्यसाध्या भोगभाग्यगतीअशा ॥

## आर्या ४३

जींजन्मकर्मफलदा कर्मेंबहुलासकाममानवतो ॥
भोगैश्वर्यगतीजे स्वर्गार्थीवहुतिलाचमानवतो ॥

## दोहरा ४३

भोगबढाईकेलयें करतकपासोंप्रीत ॥
स्वर्गलाभकीकामना हरतजुतिनकेचित्त ॥

## ओवी ४३

सकामबुद्धिअचारती ॥ स्वर्गसुखातेंपावती ॥
पुण्यसरलियाअंतीं ॥ पुनरपिभोगितीभोग ॥

## अभंग ४३

थोराकर्मेंसाधेधनें ॥ जनसाधितीसाधनें ॥
नावेकहोत्यामार्गानें ॥ द्विजवृंदेंचालिलीं ॥ १ ॥
भोगभोग्यगतीअशा ॥ मत्स्यलुब्धगळामिषा ॥
स्वर्गपरिपेंदुराशा ॥ जन्मकर्मफळरूप ॥ २ ॥
तुकाह्मणेवासनेला ॥ भोगगोडीअशेषाला ॥
सुखजायमगशोकाला ॥ प्राप्तहोणेंअखंड ॥ ३ ॥

## श्लोक ४४

भोगैश्वर्यप्रसक्तानांतयाऽपहृतचेतसाम् ॥
व्यवसायात्मिकाबुद्धिःसमाधौनविधीयते ॥

## समश्लोकी ४४

भोगभोग्यांतआसक्त कामनाहृतबुद्धिजे ॥
एकाग्रतासमाधींत नबुद्धीसतयांचिया ॥

## आर्या ४४

पुष्पितवाणिसभुलले भोगैश्वर्यप्रसक्ततेविषयीं ॥

व्यवसायात्मिकबुद्धी त्यालानोहेसमाधिच्याविषयीं ॥

## दोहरा ४४

भोगबढाइकामनाचित्त तिनकोहरोलेत ॥
निश्चयकरिकेबुद्धको नहिसमाधिमेंदेत ॥

## ओवी ४४

भोगभोग्यांतआनंद ॥ कामनात्मतस्वरूपानंद ॥
एकाग्रतासमाध ॥ तयाचीहिनबुद्धी ॥

## अभंग ४४

भोगाभ्यासेंभाग्यदिसे ॥ सक्तहोईमानसें ॥
जैसेंसकामासीपिसें ॥ पैंनारीचेंलागलें ॥ १ ॥
हरिलीकामनेनेंबुद्धी ॥ उरोंनेदीआत्मशुद्धी ॥
हिवेंपीडिलातोकधीं ॥ प्रावरणासीसोडिना ॥ २ ॥
मगसमतासमाधींत ॥ बुद्धिघालूंनेदीहात ॥
तुकाह्मणेप्रेत ॥ कायजाणेअमृता ॥ ३ ॥

## श्लोक ४५

**त्रैगुण्यविषयावेदानिस्त्रैगुण्योभवार्जुन ॥**
**निर्द्वंद्वोनित्यसत्वस्थोनिर्योगक्षेमआत्मवान् ॥**

## समश्लोकी ४५

काम्याचेवेदविषय पार्थानिष्कामहोयतूं ॥
आणिनिश्चितनिर्द्वंद्व नित्यसत्वस्थआत्मवित् ॥

## आर्या ४५

सत्वस्थद्वंद्वरहित निर्गुणहोत्रिगुणविषयहावेद ॥
जितचित्ताकौंतेया योगक्षेमींनवाहिजेखेद ॥

## दोहरा ४५

त्रिगुनकर्मकोंकहतहै बेदसुतत्यजुमीत ॥
धीरजधरेसुखदुखलहे जोगछिनतजुचीत ॥

## ओवी ४५

त्रिगुणात्मकवेदजाण ॥ अर्जुनाहोयतूंनिर्गुण ॥
सत्वेंराहेद्वंद्वत्यजून ॥ आत्मवींअसोनियां ॥

## अभंग ४५

कामिकचित्ताचेंरंजन ॥ वेदबोलिलावचन ॥
परीविषयतेसान ॥ मानिताचिपोससी ॥ १ ॥
पार्थानिष्कामहोयतूं ॥ माझेवाक्यधरुनीतूं ॥
जैसानिर्द्वंद्वनिश्चितू ॥ नित्यसत्वनसोडी ॥ २ ॥
आत्मवेत्ताहोऊनियां ॥ त्यागीकल्पनीकमाया ॥
तुकाह्मणेकाया ॥ काळजैसासांडवी ॥ ३ ॥

## श्लोक ४६

यावानर्थउदपानेसर्वतःसंप्लुतोदके ॥
तावान्सर्वेषुवेदेषुब्राह्मणस्यविजानतः ॥

## समश्लोकी ४६

जेंजेंकार्यजळींक्षुद्रीं होतेंडोहांतसर्वतें ॥
वेदींकाम्यसुखेंतेंही ब्रह्मींब्रह्मज्ञजोतयां ॥

## आर्या ४६

कूपादिउदकपानीं जींकार्येंतींमहान्हृदींघडती ॥
तैशींवेदोक्तफळें ब्रह्मज्ञान्यासिसर्वसांपडती ॥

## दोहरा ४६

सरितासागरकूपसों सरतजुयेकेकाज ॥

तैसेंजानेंब्रह्मकों लेतवेदकोंसाज ॥

## ओवी ४६

स्वल्पउदकींघडेजेंकाहीं ॥ तेंसर्वसंपादितीव्हदाचेठायीं ॥
वेदशास्त्रज्ञासही ॥ तेंसुखब्रह्मींमिळे ॥

## अभंग ४६

स्वल्पोदकींजेंजें कार्यपैंउपजे ॥ तेंतेंचनिपजेडोहामाजी ॥ १ ॥
वेदक्रियाकाम्य उद्भवेनियम्य ॥ तेंतेंघडेसाम्य ब्रह्मबोधीं ॥२॥
ब्रह्मींजोब्रह्मज्ञ सुखीतोसर्वज्ञ ॥ तुकाह्मणेप्राज्ञ पुढेंऐका ॥ ३ ॥

## श्लोक ४७

**कर्मण्येवाधिकारस्तेमाफलेषुकदाचन ॥**
**माकर्मफलहेतुर्भूर्मातेसंगोऽस्त्वकर्मणि ॥**

## समश्लोकी ४७

अधिकारतुझेंकर्मीं तत्फळींनकदापिही ॥
ह्मणीतूंटाकिसीकर्म ह्मणीतूंफळइच्छिसी ॥

## आर्या ४७

कर्मींअधिकारअसो नकधींत्याच्याफळींअसोपार्था ॥
नफळासीकारणहो नत्यागावेंचकर्मरूपार्था ॥

## दोहरा ४७

तूंअधिकारिकर्ममें नहिफलकोहेत ॥
कर्मनिकेंफलछांडिकें गहिकर्मकरीचेत ॥

## ओवी ४७

कर्माधिकारीहोऊनी ॥ तेंफळनधरीमनीं ॥
फळाविरहितहोऊनी ॥ कर्मकरावें ॥

## अभंग ४७

अधिकारकर्मींतूंतेंआहेपार्था ॥ परीनसर्वथाफळींत्याच्या ॥ १ ॥
कंटाळुनजरीत्यागकर्मींधरी ॥ तेयाधरेवरीअयोग्यकीं ॥ २ ॥
झणीफळआशाधरीसीवीरेशा ॥ तुकाह्मणेनाशाकारणहें ॥ ३ ॥

## श्लोक ४८

योगस्थःकुरुकर्माणिसंगंत्यक्त्वाफलानिच ॥
सिद्ध्यसिद्ध्योःसमोभूत्वासमत्वंयोगउच्यते ॥

## समश्लोकी ४८

योगस्थकरिकर्मंतूं होउनीटाकुनीफळें ॥
सिद्धीअसिद्धींतसम समत्वायोगबोलिजे ॥

## आर्या ४८

योगस्थहोउनिकरी कर्मासोडुनिधनंजयासमता ॥
सिद्धिअसिद्धीसमत्या मानीतूंजाणयोगतोसमता ॥

## दोहरा ४८

जोगकेंलियेकर्मकूं सबेसंगकोंत्याग ॥
सिद्धिअसिद्धिसमानगनु यहहैजोगअनुराग ॥

## ओवी ४८

योगआचरोनी ॥ कर्मफळसंगत्यजूनी ॥
सिद्धिअसिद्धिसमधरूनी ॥ तोअनुरागी ॥

## अभंग ४८

सिद्धिगेलेंकर्म तरीनासंभ्रम ॥ आणिउपोपरम जाचूंनेदी ॥ १ ॥
ऐसेंकरीचित्त कर्मआचरत ॥ फळींत्याचाहेत नठेवूनी ॥ २ ॥
योगस्थकरावें समत्वींभरावें ॥ तुकाह्मणेव्हावें जीवन्मुक्त ॥ ३ ॥

## श्लोक ४९

**दूरेणह्यवरंकर्मबुद्धियोगाद्धनंजय॥**
**बुद्धौशरणमन्विच्छकृपणाःफलहेतवः॥**

## समश्लोकी ४९

बुद्धियोगाहुनीनीच कर्मफारधनंजया ॥
पाहेरक्षकबुद्धीतें तुच्छेंकर्मेंफळप्रदें ॥

## आर्या ४९

जाणुनिसुबुद्धियोगा हुनिपार्थाकर्मयोगतोअवर ॥
जाबुद्धिसबाशरण कृपणफळेच्छेसतूंकदानवर ॥

## दोहरा ४९

बुद्धिजोगसेंकर्मकों अर्जुनतोघटिजान ॥
शरणहोहुबुद्धिकें दीनकामनमान ॥

## ओवी ४९

बुद्धियोगाहुनीहीन ॥ ज्ञानयोगातेंइच्छून ॥
कर्मकरीफलटाकून ॥ तुच्छफळ ॥

## अभंग ४९

बुद्धियोगाहूनकर्मयोगसान ॥ धनंजयाज्ञानबुझेंऐसें ॥ १ ॥
पाहेरक्षकयाबुद्धिकुरुराया ॥ तुच्छकर्मेंतूंयाटाकीफळें ॥ २ ॥
प्रकृतीवांचूनीभांबावलेज्ञानी ॥ तुकाह्मणेज्यांनींआंटाआटी॥३॥

## श्लोक ५०

**बुद्धियुक्तोजहातीहउभेसुकृतदुष्कृते॥**
**तस्माद्योगाययुज्यस्वयोगःकर्मसुकौशलम्॥**

## समश्लोकी ५०

जिताचिपापपुण्यांतें नाशितोबुद्धियुक्तजो ॥
ह्मणोनियोगीतूंयोज कर्मींकौशल्ययोगतो ॥

## आर्या ५०

जोबुद्धियुक्तनरतो टाकीदुष्कृतसुकृतउपशल्य ॥
यास्तवयोगासिकरी योगचितोजाणकर्मकौशल्य ॥

## दोहरा ५०

बुद्धिजुगतदोउतजगत कहांपुण्यकहांपाप ॥
जोकर्मतेंचतुरहइ सोइकरीतूंआय ॥

## ओवी ५०

ज्ञानअंगीकारूनी ॥ फळेंहरपतीदोनीं ॥
योगातेंअंगीकारुनी ॥ कुशळहोय ॥

## अभंग ५०

जितांपापपुण्य नाशीबुद्धिगुणें ॥ ज्याचींपैंअगण्य सद्वासना ॥ १॥
ह्मणोनीपांडवा बुद्धियोगघ्यावा ॥ कर्मीअनुभवा कुशळत्वें ॥ २ ॥
येणेमार्गेजाणें कर्मासीतोडणें ॥ आनंदभोगणें ह्मणेतूका ॥ ३ ॥

## श्लोक ५१

कर्मजंबुद्धियुक्ताहिफलंत्यक्त्वामनीषिणः ॥
जन्मबंधविनिर्मुक्ताःपदंगच्छंत्यनामयम् ॥

## समश्लोकी ५१

शास्त्रज्ञजेबुद्धियुक्त कर्माचेंफळटाकुनी ॥
संसारबंधछेदूनी निर्दोषपदपावती ॥

## आर्या ५१

जेबुद्धियुक्तनरते टाकुनिकर्माफलानुसंधानें ॥

पावतिअनामयपदा होउनियांलिप्तजन्मबंधानें ॥

दोहरा ५१

चाहतनहिकर्मफल जेपंडितबडभाग ॥
कर्मबंधकोंछोडिकें लहतमुक्तअनुराग ॥

ओवी ५१

ह्मणोनियोगीकर्मकरिती ॥ फलसंगादिकेंत्यजिती ॥
जन्मबंधावेगळेहोती ॥ पदपावतीअनामय ॥

अभंग ५१

शास्त्रज्ञजेबुद्धी युक्तपैंविशुद्धी ॥ कर्मफळविधी सोडूनीयां ॥ १ ॥
प्रपंचबंधन विवेकेंतोडून ॥ पावतीनिर्वाण निर्दोषीक ॥ २ ॥
तुकाह्मणेदेव ज्ञानाचाअनुभव ॥ सुगमहेंठेव साधकाची ॥ ३ ॥

श्लोक ५२

यदातेमोहकलिलंबुद्धिर्व्यतितरिष्यति ॥
तदागंतासिनिर्वेदंश्रोतव्यस्यश्रुतस्यच ॥

समश्लोकी ५२

अज्ञानमोहमयहें तुझीबुद्धितरेजयीं ॥
श्रुतअश्रुतभोगाचें तेव्हांवैराग्यपावसी ॥

आर्या ५२

जेव्हांबुद्धितुझीहे पार्थाउतरेलमोहमयकलिला ॥
श्रोतव्यश्रुततेव्हां टाकिलपावोनिभक्तिचीकलिला ॥

दोहरा ५२

मोहसधताजबतजे अर्जुनतेरीबुद्ध ॥
जबपेलेवैरागको चित्तमेंकरिकेशुद्ध ॥

## ओवी ५२

ज्ञानजाणितलिया ॥ मोहसागरींतरतीधनंजया ॥
पाविजेतयाठायां ॥ वैराग्यपावसी ॥

## अभंग ५२

अज्ञानमोहमय व्याप्तचित्तस्वयें ॥ तेव्हांतिजपाहे तेचबुद्धि ॥ १ ॥
मगश्रुताश्रुत भोगाचीप्रतीत ॥ झाल्याप्राप्तहोत वैराग्यतें ॥ २ ॥
तुकाह्मणेप्राण पश्चात्तापाविण ॥ नदेखेनिर्गुण वैराग्यतें ॥ ३ ॥

## श्लोक ५३

श्रुतिविप्रतिपन्नातेयदास्थास्यतिनिश्चला ॥
समाधावचलाबुद्धिस्तदायोगमवाप्स्यसि ॥

## समश्लोकी ५३

लौकिकश्रवणेंतूझी मळलीशुद्धहोयहे ॥
बुद्धिथोरसमाधींत तेव्हांतूंयोगपावसी ॥

## आर्या ५३

श्रुतिविप्रतिन्नातव बुद्धिसमाधींमधींचसाअचळ ॥
जेव्हांस्थिरहोइलवा तेव्हांयोगासिपावसीअचळ ॥

## दोहरा ५३

तेरीबुद्धवैराग्यमे थिररहीजबमीत ॥
तबसमाधिमेंजागेतूं लहिहेनिहचलचित्त ॥

## ओवी ५३

श्रवणसंदेहवाटेलजरी ॥ संदेहटाकूनिसांवरी ॥
तेणेंपावसीअवधारीं ॥ योगाभ्यास ॥

## अभंग ५३

फळाच्याश्रवणें तवबुद्धिशिणे ॥ तेणेंमळवणे निरंतर ॥ १ ॥

तेशुद्धव्हावया समाधीआलीया ॥जेव्हांकांविसांया बुद्धियेते॥२॥
तेव्हांतूंपावसी माझियायोगासी ॥ देवअर्जुनासी ऐसेंबोलें ॥ ३ ॥
ऐकावयाचित्त एकाग्रमारुत ॥ तुकाह्मणेमात धन्यझाली ॥ ४ ॥

## श्लोक ५४

अर्जुनउवाच ॥

**स्थितप्रज्ञस्यकाभाषासमाधिस्थस्यकेशव ॥**
**स्थितधीःकिंप्रभाषेतकिमासीतव्रजेतकिम् ॥**

## समश्लोकी ५४

स्थितप्रज्ञकसासांग जोसमाधिस्थसर्वदा ॥
केशवाकायतोबोले असेवर्तेजगींकसा ॥

## आर्या ५४

चित्तैकाग्रताची स्थितधीचीकेशवाकवणभाषा ॥
स्थितधीकसाअसेतो बोलेचालेहिसांगनिर्दोषा ॥

## दोहरा ५४

जाकीबुद्धनिहचलसदा ताकोंचिन्हबताय ॥
कैसेंबोलतक्यौंरहत चलतसुएकीभाय ॥

## ओवी ५४

स्थितप्रज्ञाचीबुद्धीकैसी ॥ योगींवर्तणूककैसी ॥
योगझालियात्यासी ॥ स्थितप्रज्ञजाणिजे ॥

## अभंग ५४

बोलेपांडुपुत्र देवासीउत्तर ॥ सांगाकोणनर स्थितप्रज्ञ ॥ १ ॥
जोकांसमाधिस्थ सर्वदानेमस्त ॥ केशवाप्रशस्त बोलावेंजी॥२॥
वागतोयाजगीं कैसाहोप्रसंगीं ॥ तुकाह्मणेजगीं निर्मीकैसी॥ ३ ॥

## श्लोक ५५

श्रीभगवानुवाच ॥

प्रजहातियदाकामान्सर्वान्पार्थमनोगतान् ॥
आत्मन्येवात्मनातुष्टःस्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥

## समश्लोकी ५५

पार्थासकळहीटाकी जेव्हांकाममनांतिल ॥
स्वरूपींचमनेंतुष्ट तोस्थितप्रज्ञबोलिजे ॥

## आर्या ५५

टाकीजेव्हांपार्था चित्तापासूनिसर्वकामासी ॥
संतुष्टात्मातेव्हां धरीस्थितप्रज्ञयोग्यनामांसी ॥

## दोहरा ५५

जोहैमनमोंकामना तिनकोंतजेजीकोय ॥
आतमसोंसंतोखगहि निह्चलबुद्धीसोय ॥

## ओवी ५५

देवह्मणेपार्था ॥ जोनातळेकाममनोरथा ॥
आत्मसुखींस्थिरता ॥ तोस्थितप्रज्ञबोलिजे ॥

## अभंग ५५

अगायेअर्जुना सावधानमना ॥ जेणेंयाकामना टाकियेल्या ॥ १ ॥
स्वरूपींमानस तोषलेंसुरस ॥ निधीपायाळास तयारीनीं ॥ २ ॥
स्थितप्रज्ञतोची ह्मणूंसव्यसाची ॥ समाधीजयाची अखंडीत ॥ ३ ॥
आनंदेंभरीत सर्वकाळचित्त ॥ तुकाह्मणेस्थित प्रज्ञऐसा ॥ ४ ॥

## श्लोक ५६

दुःखेष्वनुद्विग्नमनाःसुखेषुविगतस्पृहः ॥

वीतरागभयक्रोधःस्थितधीर्मुनिरुच्यते ॥

## समश्लोकी ५६

नदुःखींमनउद्विग्न नसुखाचीस्पृहाजया ॥
कामक्रोधभयातीत स्थितधीमुनिबोलिजे ॥

## आर्या ५६

दुःखींउद्विग्ननव्हे निस्पृहहिसुखींअसादिसेलनधीं ॥
पार्थाक्रोधाग्निरहित जाणावासाधुनींजगींस्थितधी ॥

## दोहरा ५६

दुःखकोंतजीभागेनहि सुखचाहेनहिचित्त ॥
तजेनेहऔरक्रोधभय सुनिअचलबुद्धिसुमीत ॥

## ओवी ५६

दुःखेंनिश्चळसुखसंगीं ॥ भयक्रोधटाकूनिवीतरागी ॥
तोमुनीजाणजगीं ॥ स्थितप्रज्ञबोलिजे ॥

## अभंग ५६

नदुःखमानसींउद्विग्नहोईना ॥ सुखेंहीवांछीनाश्रमसोसे ॥ १ ॥
आस्थानधरीचआसोनीयांआनी ॥ कामक्रोधमनींभयातीत॥२॥
स्थिरबुद्धिमूनीतयासह्मणावें ॥ तुकाह्मणेपावेमहासुख ॥ ३ ॥

## श्लोक ५७

यःसर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्यशुभाशुभम् ॥
नाभिनंदतिनद्वेष्टितस्यप्रज्ञाप्रतिष्ठिता ॥

## समश्लोकी ५७

नसर्वत्रजयास्नेह बरेंवाईटभोगुनी ॥
बरेंवाईटनह्मणे त्याचीप्रज्ञाप्रतिष्ठित ॥

## आर्या ५७

पावुनिशुभाशुभांसहि हर्षद्वेषोर्मिचीनदीउतरे ॥
कोठेंस्नेहनसेज्या त्याचीप्रज्ञासदाप्रतिष्ठितरे ॥

## दोहरा ५७

नेहकाहुसोंनकरे भलेबुरेकिनहिचाह ॥
भलेबुरेसोंकाजनहि थिरबुद्धिलखियेताह ॥

## ओवी ५७

शुभाशुभप्राप्तझालिया ॥ ममत्वेंनगुंतेतयाठायां ॥
आनंदबुद्धितया ॥ त्याचीप्रज्ञाप्रतिष्ठिली ॥

## अभंग ५७

सर्वांदेहींप्राणसमानत्यापरी ॥ नाठवेअंतरींगुणदोष ॥ १ ॥
बऱ्यावाईटाचाघेतूंअनुभव ॥ होऊंनेदीजीवकासावीस ॥ २ ॥
मुखेंउच्चारीतांतोचिप्रज्ञावंत ॥ प्रतिष्ठापावतलक्षणेतूका ॥ ३ ॥

## श्लोक ५८

यदासंहरतेचायंकूर्मोऽगानीवसर्वशः॥
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्यप्रज्ञाप्रतिष्ठिता॥

## समश्लोकी ५८

जैसाकासवसर्वांगें इंद्रियेंविषयांतुनी ॥
अवरूनिअसेतेव्हां त्याचीप्रज्ञाप्रतिष्ठित ॥

## आर्या ५८

विषयांतुनआकर्षी इंद्रियगणजेविंअवयवाकूर्म ॥
तोचिप्रतिष्ठितमती योगाचेंजाणतोमहावर्म ॥

## दोहरा ५८

जोकछुवानिजअंगकों खैंचअपमेलेत ॥

तैसेंखेंचेइंद्रियतजि विखयनसोंलेत ॥

## ओवी ५८

कासवअंगजैसें ॥ हातपायअवरीसरसें ॥
इंद्रियआवरूनिविशेषें ॥ तयाज्ञानप्रतिष्ठिलें ॥

## अभंग ५८

कूर्मजैसाभावरोधीशरीराचा ॥ तैसाइंद्रियांचामेळूधरी ॥ १ ॥
आवरोनिअसेऐसाजोयोगीया ॥ प्रज्ञात्याचीतयाप्रतिष्ठीत ॥२॥
पर्वकाळींदानसुकृतदात्याचें ॥ तैसेंप्रपंचाचेंतुकामानी ॥ ३ ॥

## श्लोक ५९

विषयाविनिवर्त्ततेनिराहारस्यदेहिनः॥
रसवर्जंरसोऽप्यस्यपरंदृष्ट्वानिवर्तते ॥

## समश्लोकी ५९

रोगीव्रतीतयालागी नभोगतरिवासना ॥
असेतेहीज्ञानियांची जातेब्रह्मात्मदर्शनें ॥

## आर्या ५९

तोंतोंवाढेगोडी जोंजोंटाकीचविषयआहार ॥
जेव्हांब्रह्मकळेवा गोडीचातेंचहोयसंहार ॥

## दोहरा ५९

विखयकरतहैदूरसों तजतहैआहार ॥
आतमदेख्योजातहै अभिलाख्योनिरधार ॥

## ओवी ५९

निराहारीअसे ॥ विषयवर्जेतुटतीफांसे ॥
त्याचीवासनाअसे ॥ तीजातसेब्रह्मदर्शनें ॥

## अभंग ५९

योगीवीतरागीत्याचेंएकमन ॥ भोगनसतांजाणवासनाहे ॥ १ ॥
जरीआसेतरीब्रह्मात्मदर्शनीं ॥ मुक्तयेथेंज्ञानीहोऊंसरती ॥ २ ॥
तुकाह्मणेमनझालीयानिश्चळ ॥ तेंचितेंकेवळपरब्रह्म ॥ ३ ॥

## श्लोक ६०

यततोह्यपिकौंतेयपुरुषस्यविपश्चितः॥
इंद्रियाणिप्रमाथीनिहरंतिप्रसभंमनः॥

## समश्लोकी ६०

ज्ञानीनरप्रयत्नीजो त्याचीहीकुंतिनंदना ॥
इंद्रियेंबळवंतेंहीं बळेंचिहरितीमना ॥

## आर्या ६०

जरिहीसाधकमोठा ज्ञानीपुरुषप्रयत्नहीकरितो ॥
तरिहीमथुनिहटानें इंद्रियगणत्याचियामनाहरितो ॥

## दोहरा ६०

ग्यानवंतजोपुरुखहै लहतकठनतासाध ॥
इंद्रियअतिबळवंतहै तऊलगावतब्याध ॥

## ओवी ६०

पुरुषप्रयत्नविचक्षण ॥ आपणज्ञानीअसोन ॥
इंद्रियेंमननेतीहरून ॥ कौंतेयाजाणतूं ॥

## अभंग ६०

आत्मज्ञानीनरजोपूर्णप्रयत्नी ॥ कौंतेयाजोध्यानींमाझ्यारूपीं ॥१॥
परिइंद्रियांसीविसांवलाजरी ॥ तरीतेअघोरींघालतील ॥ २ ॥
तुकाह्मणेमनइंद्रियांस्वाधीन ॥ ह्मणोनिसाधनविघ्नपावे ॥ ३ ॥

श्लोक ६१

तानिसर्वाणिसंयम्ययुक्तआसीतमत्परः॥
वशेहियस्येंद्रियाणितस्यप्रज्ञाप्रतिष्ठिता॥

समश्लोकी ६१

तींआवरोनिअसतो युक्तहोऊनिमत्पर ॥
इंद्रियेंवशहींज्याला त्याचीप्रज्ञाप्रतिष्ठित ॥

आर्या ६१

युक्तअसावेंमत्पर ज्यासर्वेंद्रियगणासिसंयमुनी ॥
इंद्रियगणवशत्याला प्रतिष्ठितप्रज्ञजाणतोचिमुनी ॥

दोहरा ६१

तातेंरोकेइंद्रियनमो मेंचित्तकेलाय ॥
बसकीन्होजनयहसब बेसोथिरबुद्धिसुभाय ॥

ओवी ६१

सर्वनेमालागुनी ॥ युक्तनाहींयोगाङ्गुनी ॥
इंद्रियेंवशकेल्यानी ॥ त्याचेंज्ञानप्रतिष्ठित ॥

अभंग ६१

नयामनालागीआवरोनिआसे ॥ युक्तराजतसेमत्परजो ॥ १ ॥
इंद्रियहिवशज्यालापैंआसती ॥ त्याचीप्रतिष्ठितप्रज्ञाहोय ॥ २ ॥
तुकाह्मणेयेथेंकुसंगनसाधा ॥ तेणेंचीपावावानिजमोक्ष ॥ ३ ॥

श्लोक ६२

ध्यायतोविषयान्पुंसःसंगस्तेषूपजायते॥
संगात्संजायतेकामःकामात्क्रोधोऽभिजायते॥

समश्लोकी ६२

चिंतीविषयजोत्यातें उपजेभोगवासना ॥

तेकामातेंउपजवी कामक्रोधासिनिर्मितो ॥

## आर्या ६२

विषयध्यानेंपुरुषा होतोविषयींधनंजयासंग ॥
संगापासुनिकाम क्रोधतयाचाउठेचिअनुसंग ॥

## दोहरा ६२

जबधांवतहैबिखयकों तिनतेंउपजतसंग ॥
कामजुउपजतसंगतें तातेंक्रोधअभंग ॥

## ओवी ६२

विषयांचेंध्यानकरी ॥ विषयसंगेंकामअंतरीं ॥
कामापासूनिक्रोधभारी ॥ ऐसेंहेहोतीनिर्माण ॥

## अभंग ६२

चिंतीविषयांलाउपजेवासना ॥ भोगहापुरेनाविषयाचा ॥ १ ॥
तोयाकामालागींउत्पन्नकरितो ॥ कामतोनिर्मितोक्रोधरूपा ॥२ ॥
तुकाह्मणेबीजापासुनीअंकुर ॥ होतीहाविस्तारयेचपरी ॥ ३ ॥

## श्लोक ६३

**क्रोधाद्भवतिसंमोहःसंमोहात्स्मृतिविभ्रमः॥**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशोबुद्धिनाशात्प्रणश्यति ॥**

## समश्लोकी ६३

क्रोधेंदेहात्मतामोह मोहेंआत्मस्मृतिभ्रम ॥
स्मृतिभ्रंशेंबुद्धिनाश मगतोमूढपूर्ववत् ॥

## आर्या ६३

क्रोधापासुनिमोहहि मोहापासुनिउठेस्मृतिभ्रमतो ॥
स्मृतिनाशेंमतिनाशे मज्ञानाशेंभवभ्रमींभ्रमतो ॥

## दोहरा ६३

मोहहोतहैक्रोधतें मोहतेंसुधिनास ॥
सुधिगयेबुद्धिहीनासत बुद्धिनसेंम्रतपास ॥

## ओवी ६३

क्रोधापासुनिमोहो ॥ स्मृतीच्याभ्रंशीठावो ॥
स्मृतिबुडालियाभावो ॥ मूर्खहोतसे ॥

## अभंग ६३

क्रोधेंदेहात्मताबुद्धिहेउपजे ॥ मोहेंकवळीजेअंतःकर्ण ॥ १ ॥
तेथुनियांआत्मस्मृतिभ्रंशजाण ॥ स्मृतिभ्रंशेंजाणबुद्धिनाश॥२ ॥
मगतेथुनीयांपूर्ववतमूढ ॥ होतसेसदृढह्मणेतुका ॥ ३ ॥

## श्लोक ६४

रागद्वेषवियुक्तैस्तुविषयानिंद्रियैश्चरन् ॥
आत्मवश्यैर्विधेयात्माप्रसादमधिगच्छति ॥

## समश्लोकी ६४

रागद्वेषाविरहितें इंद्रियेंवशर्जीतिहीं ॥
घेतोविषयशुद्धात्मा तोप्रसादासिपावतो ॥

## आर्या ६४

स्वाधिनइंद्रियजरिहीं विषयांभोगावयासिउद्योगी ॥
रागद्वेषाविणमज जिंकुनिपावेप्रसादमद्योगी ॥

## दोहरा ६४

रागद्वेषकोंजोतजे औरविखयाकोंसेव ॥
इंद्रियजोनिजबसकरे लहेशांतिकोभेव ॥

## ओवी ६४

रागद्वेषअसेवर्जून ॥ तोआत्मावशकरून ॥

इंद्रियासंगेंभोगभोगून ॥ तोप्रसादभोगील ॥

## अभंग ६४

रागद्वेषावीणइंद्रियेंस्वाधीन ॥ तरीतेणेंमनसोडवेना ॥ १ ॥
घेतसेविषयपरिविशुद्धझाला ॥ प्रसादींमहिमापावेलतो ॥ २ ॥
हरिहरांमनझालेंजेंअर्पण ॥ तुकाह्मणेपूर्णप्रसादतो ॥ ३ ॥

## श्लोक ६५

प्रसादेसर्वदुःखानांहानिरस्योपजायते ॥
प्रसन्नचेतसोह्याशुबुद्धिःपर्यवतिष्ठते ॥

## समश्लोकी ६५

प्रसादेंयाचियासर्वा दुःखांचानाशहोतसे ॥
प्रसन्नबुद्धिचित्तास प्रतिष्ठाशीघ्रपावते ॥

## आर्या ६५

होतांप्रसादचित्तीं निरसीदुःखासमूळहीसुज्ञ ॥
चित्तप्रसन्नज्याचें जाणावातोप्रतिष्ठितप्रज्ञ ॥

## दोहरा ६५

शांतिजबेंयहगतिहै होतदुःखकोहान ॥
बुद्धितबेंथिरहोतहै यहतुच्छजमान ॥

## ओवी ६५

प्रसादपावलियावरी ॥ सर्वदुःखहोयबोहरी ॥
आत्मप्रसादेंचित्तआवरी ॥ प्रतिष्ठापावतो ॥

## अभंग ६५

प्रसादेंयाचियासर्वदुःखांनाश ॥ पावेअविनाशमहासुख ॥ १ ॥
प्रसन्नतेबुद्धीचित्ताचीआयती ॥ पावेतोमहंतीप्रतिष्ठेची ॥ २ ॥
शीघ्रतयासर्वलाभेंमहालाभ ॥ तुकाह्मणेलंभशुद्धआचा ॥ ३ ॥

## श्लोक ६६

नास्तिबुद्धिरयुक्तस्यनचायुक्तस्यभावना ॥
नचाभावयतःशांतिरशांतस्यकुतःसुखम् ॥

## समश्लोकी ६६

नाहीबुद्धिअयुक्ताला अयुक्ताध्यानहीनसे ॥
ध्यानाविणेंनयेशांति अशांताकोठुनीसुख ॥

## आर्या ६६

बुद्धिअयुक्तासनसे ध्यानहिपार्थानसेअयुक्ताला ॥
ध्यानाविणशांतिनसे होइलसुखकोठुनीअशांताला ॥

## दोहरा ६६

जोगबिनाबुद्धिनहि बुद्धिबिनहोतनध्यान ॥
ध्यानबिनासंतोखनहि ताबिनसुखनसुजान ॥

## ओवी ६६

ज्ञानाविनानसांपडेबुद्धि ॥ बुद्धिविनाभावशुद्धि ॥
ध्यानावांचूनिशांति ॥ कोठूनियेसुख ॥

## अभंग ६६

अयुक्तजोत्यालानसेबुद्धिपार्था॥ध्यानाचियापंथाजावोंनेणें ॥१॥
ध्याननाहींतेथेंशांतिहीवसेना ॥ सुखआठवेनाअशांतासी ॥ २ ॥
तळमळीचित्तकैंचेंत्याचेंहीत ॥ तुकाह्मणेअंतसद्विवेसी ॥ ३ ॥

## श्लोक ६७

इंद्रियाणांहिचरतांयन्मनोऽनुविधीयते ॥
तदस्यहरतिप्रज्ञांवायुर्नावमिवांभसि ॥

## समश्लोकी ६७

इंद्रियेंवर्ततांजेकां मोकळेंमनसोडिजे ॥
तयाचीबुद्धिहरितें वारानावजळींजसा ॥

## आर्या ६७

धांवतिविषयींकरणें ज्यांचेंघेधांवचित्तत्यामागें ॥
हारीमगमनत्याचें जैसीनेनावअंबुध्यावोघें ॥

## दोहरा ६७

इंद्रियजिततितफिरतहै तनमनलावतखैंच ॥
मनबुद्धिहरलेतहै वायूनावजुऐंच ॥

## ओवी ६७

इंद्रियेंबिचरतअसतां ॥ आव[illegible]चित्ता ॥
प्रज्ञानाशेंपाहतां ॥ उदकींनाववायुबळें ॥

## अभंग ६७

इंद्रियेंवर्ततांजेकां ॥ मनादेतीमोकळिका ॥ १ ॥
तयाचिरेमगबुद्धी ॥ हरोनिनेतदेहशुद्धी ॥ २ ॥
वारालागलीयानाव ॥ पावोनेणेंपैलठाव ॥ ३ ॥
तुकाह्मणेसाधकानें ॥ बोधमानीजेसुखानें ॥ ४ ॥

## श्लोक ६८

तस्माद्यस्यमहाबाहोनिगृहीतानिसर्वशः ॥
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्यप्रज्ञाप्रतिष्ठिता ॥

## समश्लोकी ६८

तस्मात्सर्वेंद्रियेंज्याचीं विषयांपासुनीवरीं ॥
आटोपिलींमहाबाहो त्याचीप्रज्ञाप्रतिष्ठित ॥

## आर्या ६८

यास्तवज्याणेंदमिली विषयापासोनिइंद्रियेंसकळें ॥
त्याचीप्रतिष्ठितमती योगाचीयुक्तिसर्वज्यासकळे ॥

## दोहरा ६८

जिनइंद्रियरोकीसबें ठौरठौरतेंन्याय ॥
बिखयत्यागतिनहीकियो थिरबुद्धितताहीभाय ॥

## ओवी ६८

याकारणेंअर्जुना ॥ विषयापासावकरीवंचना ॥
टाकीइंद्रियवासना ॥ तेप्रज्ञाप्रतिष्ठिली ॥

## अभंग ६८

तस्मातइंद्रियें ॥ सर्वज्याचीमनोमयें ॥ १ ॥
विषयापासोनी ॥ जोबैसलाआटोपोनी ॥ २ ॥
महाबाहोप्रज्ञात्याची ॥ महिमापावेप्रतिष्ठेची ॥ ३ ॥
तुकाह्मणेआतां ॥ लाभघेणेंसावधश्रोतां ॥ ४ ॥

## श्लोक ६९

यानिशासर्वभूतानांतस्यांजागर्तिसंयमी ॥
यस्यांजाग्रतिभूतानिसानिशापश्यतोमुनेः ॥

## समश्लोकी ६९

ब्रह्मनिष्ठानिशालोकां जागेहातेथसंयमी ॥
विषयींजागतीलोक याद्रष्ट्यातेंजशीनिशा ॥

## आर्या ६९

सकळाभूतांचीजे निशातयेमाजिसंयमीजागा ॥
जागतिभूतेंजींत द्रष्टमुनीचीनिशापहाजागा ॥

## दोहरा ६९

जोजनजागतनहिहै तहांउनकोबास ॥
जीवजहांजागतसबें सोमुनिकोनिसिबास ॥

## ओवी ६९

जेरात्रीसर्वभूतीं ॥ तेसमयींयोगीजेजागती ॥
जेथेंभूतांचीजागृती ॥ तेरात्रीमुनीसी ॥

## अभंग ६९

ब्रह्मींलीनत्याचीराती ॥ जेथेंलोकहेवागती ॥ १ ॥
जागाजेथेंसाधुराहे ॥ तेथेंलोकझोंपीजाये ॥ २ ॥
विषयींसावधजन ॥ तेथेंयाचेंभ्रांतमन ॥ ३ ॥
तुकाविनवीथोडिये ॥ सुखजोडणेंजोडिये ॥ ४ ॥

## श्लोक ७०

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठंसमुद्रमापःप्रविशंतियद्वत् ॥
तद्वत्कामायंप्रविशंतिसर्वेंसशांतिमाप्नोतिनकामकामी

## समश्लोकी ७०

नानाजळांचाउदधींतमेळा मिळेनुलंघीतरिंसिंधुवेळा ॥
भोगास्वतःप्राप्तअसेचभोगी तोपावतोशांतिनकामकामी ॥

## आर्या ७०

पूर्णाजलसिंधुमधीं नशिरायाजलौघतोमुकतो ॥
कामौघतेंविज्यामधि पावेतोशांतिलानकामुकतो ॥

## दोहरा ७०

जैसेंजलसबसरितहै मिलतसमुद्रहिजाय ॥
सोफलकीसबकामना शांतिरहेतहाय ॥

## ओवी ७०

संपूर्णसमुद्रींजाण ॥ तेथेंउदकजायमिळोन ॥
तेवींकामनालीन ॥ शांतिपावे ॥

## अभंग ७०

नानाउदकश्रव ॥ पाहेउदकाचाठाव ॥ १ ॥
तरिमर्यादानसांडी ॥ पृथ्वीराखीतोकोरडी ॥ २ ॥
तैसेभोगभोगीसारे ॥ मस्तनोहेअविचारें ॥ ३ ॥
निष्कामाचेंपावेफळ ॥ जरीकुटुंबीकेवळ ॥ ४ ॥
शांतिबाणेत्याचेंअंगीं ॥ शिववेष्टितभुजंगी ॥ ५ ॥
अविषमतेपदवी ॥ तुकयासमचीभोगावी ॥ ६ ॥

## श्लोक ७१

विहायकामान्यःसर्वान्पुमांश्चरतिनिस्पृहः ॥
निर्ममोनिरहंकारःसशांतिमधिगच्छति ॥

## समश्लोकी ७१

टाकूनिसर्वकामांतें भोगितोभोगनिस्पृह ॥
मीमाझेंहेंनसेज्याला तोज्ञानीशांतिपावतो ॥

## आर्या ७१

टाकुनिसर्वहिकामा निस्पृहहोउनिजनांतजोजोगी ॥
निर्ममनिरहंकारी पावेतोशांतिसाधनाजोगी ॥

## दोहरा ७१

तजिकेसबमनकामना जोनिस्पृहहोय ॥
अहंकारममतातजे तामेशांतिजुहोय ॥

## ओवी ७१

सर्वकामसांडूनी ॥ संगत्यागेंनिस्पृहहोऊनी ॥

मोहअहंकारत्यजूनी ॥ शांतिपावे ॥

## अभंग ७१

सर्वभोगविषयाचे ॥ सुखथुंकूनीकामाचें ॥ १ ॥
भोगभोगीनिस्पृहाचे ॥ आत्मानंदपदवीचे ॥ २ ॥
परिमीआणीमाझें ॥ दोनीनातळतीवोझें ॥ ३ ॥
ज्ञानीशांतिसपावतो ॥ तुकाह्मणेममगुरूतो ॥ ४ ॥

## श्लोक ७२

एषाब्राह्मीस्थितिःपार्थनैनांप्राप्यविमुह्यति ॥
स्थित्वाऽस्यामंतकालेऽपिब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥

## समश्लोकी ७२

हेस्थितिर्ब्राह्मिचीपार्था नमोहेईशपावतां ॥
अंतकाळींइच्यायोगें क्षणेंहीमक्तिपावतो ॥

## आर्या ७२

धरिजोहीब्राह्मिस्थिति मोहनत्यानमितित्यासिनिर्वाण ॥
अंतींहीधरिजोही पावेलब्रह्मतोचिनिर्वाण ॥

## दोहरा ७२

ब्रह्मग्यानतोसोंकहो जातेंमोहनहोय ॥
सोबुद्धिअंतसमेरहे मिलेब्रह्ममेंजोय ॥

## ओवी ७२

अशाब्रह्मींस्थितिवर्तती ॥ मोहरूपसंसारनपावती ॥
देहावसानींस्मरती ॥ तेमुक्तजाण ॥

## अभंग ७२

हेतोब्रह्मीचीराहाटी ॥ पाहेपार्थाज्ञानदिठी ॥ १ ॥
इचेघरपावलिया ॥ मोहशिवेनाह्रदया ॥ २ ॥

अंतझालाइच्यासंगीं ॥ सायुज्यासपावेअंगीं ॥ ३ ॥
तुकाह्मणेवाट ॥ केलीसुलभहेनीट ॥ ४ ॥

## इतिश्रीमद्भगवद्गीतायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादेसांख्ययोगोनामद्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

### श्लोकवामनी

इतिटीकासमश्लोकी अध्यायादुसऱ्यावरी ॥
श्रीपार्थसारथीकर्त्ता ओवामनमनोरथीं ॥

इतिगीतार्थबोधिन्यांश्रीमद्भगवद्गीताटीकायांद्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥



## तृतीयाध्यायप्रारंभः



### वामन

बुद्धीहुनीकर्मनीच पूर्वाध्यायींवदेहरी ॥
तरिकांयोजिसीयुद्धीं ह्मणतोयेथअर्जुन ॥ १ ॥

### श्लोक १

अर्जुनउवाच

**ज्यायसीचेत्कर्मणस्तेमताबुद्धिर्जनार्दन॥**
**तत्किंकर्मणिघोरेमांनियोजयसिकेशव॥**

### समश्लोकी १

कर्माहुनीबुद्धिथोर तुजवाटेजनार्दना ॥
तरिकांघोरकर्मीया योजिसीमजकेशवा ॥

### आर्या १

हेकेशवातुलाही कर्माहुनिबुद्धिभासतीथोर ॥
तरिकांजनार्दनामज करवीशीकर्महेंमहाघोर ॥

### दोहरा १

बुद्धीभलीहैकरमतें कृष्णकहीतुमजोय ॥
करमभयानकतैंकह्यो कैसेढारतधोय ॥

### ओवी १

अर्जुनह्मणेकृष्णनाथा ॥ कर्माहूनज्ञानश्रेष्ठअसतां ॥
अघोरकर्मीकांअनंता ॥ प्रवर्तवितोसिमज ॥

### अभंग १

पार्थवदेवासुदेवा ॥ प्रश्नआमुचाऐकावा ॥ १ ॥

कर्मागळीबुद्धीहोय ॥ ऐसासांगतांप्रस्ताय ॥ २ ॥
तरीघोरकर्मीयया ॥ जनार्दनाघालावया ॥ ३॥
चिंतेपासुनीकेशवें ॥ तुकाह्मणेजीसोडावें ॥ ४ ॥

## श्लोक २

व्यामिश्रेणैववाक्येनबुद्धिंमोहयसीवमे ॥
तदेकंवदनिश्चित्ययेनश्रेयोऽहमाप्नुयाम् ॥

## समश्लोकी २

व्यामिश्रवाक्येंबुद्धीतें करिसीमोहिल्यापरी ॥
एकनेमुनितेंसांग पावेंमीश्रेयज्यास्तव ॥ २ ॥

## आर्या २

संदिग्धबोलसीकां बुद्धिसजोठकविणारत्यावाणी ॥
पावेंमीश्रेयअसी निश्चितमजसांगएकतूंवाणी ॥

## दोहरा २

बचनसुनेंसंदेहकें मोबुद्धिहैभयभीत ॥
निश्चयकरीएकेकहो लह्योमुक्तिज्याभात ॥

## ओवी २

मिश्रितवाक्येंयेणें ॥ भुलविसीमाझींअंतःकरणें ॥
तरीएकनिश्चयेंसीसांगज्याणें ॥ श्रेयपाविजेल ॥

## अभंग २

यामिश्रितउत्तरा ॥ ऐकोनिखेदअंतरा ॥ १ ॥
बुद्धिस्थितिभांबावली ॥ वृत्तिशौर्याचीलाजली ॥ २ ॥
एकपंथनिवडून ॥ सांगजयांतकल्याण ॥ ३ ॥
श्रेयपावेजयास्तव ॥ तुकयाभयेंमेणेंजीव ॥ ४ ॥

## श्लोक ३

श्रीभगवानुवाच

लोकेऽस्मिन्द्विविधानिष्ठापुराप्रोक्तामयाऽनघ ॥
ज्ञानयोगेनसंख्यानांकर्मयोगेनयोगिनाम् ॥

## समश्लोकी ३

यालोकींदोंपरीनिष्ठा पूर्वीजेम्यानिरूपिली ॥
ज्ञानयोगेंचिसांख्यांला सत्कर्मैकर्मयोगियां ॥

## आर्या ३

लोकींद्विविधानिष्ठा सांगितलीनिश्चितार्थमीवदुनी ॥
कर्मीजेत्याकर्म ज्ञान्यासीज्ञानयोगहेदोनी ॥

## दोहरा ३

निष्ठाजोद्वयभातकी पहिलीकहीबनाय ॥
सिद्धनकोग्यानभलो कर्मनिकर्मबताय ॥

## ओवी ३

दोप्रकारचीनिष्ठा ॥ पूर्वीसांगीतलीभारता ॥
सांख्यमतीज्ञानदाता ॥ योगियासकर्मयोगबोलिजे ॥

## अभंग ३

हांसोनिबोलेराधाप्रिय ॥ हेंकौंतेयाअवधारी ॥ १ ॥
निष्ठाद्विविधयालोकीं ॥ पूर्वीअसेकींबोलिली ॥ २ ॥
ज्ञानयोगेंचिसांख्याला ॥ असेकेलानिश्चयो ॥ ३ ॥
सत्कर्मैकर्मयोग्री ॥ तुकाभोगीजेंसूख ॥ ४ ॥

## श्लोक ४

नकर्मणामनारंभान्नैष्कर्म्यंपुरुषोऽश्नुते ॥

नचसंन्यसनादेवसिद्धिंसमधिगच्छति ॥

## समश्लोकी ४

जेकर्मातीततत्सिद्धी नकर्मेंकेलियाविण ॥
कर्मसंन्यासमात्रेंची नत्यासिद्धीसपावतो ॥

## आर्या ४

नैष्कर्म्यतोनपावे कर्माचाजोकरीअनारंभ ॥
केवळसंन्यासानें पुरुषासनमुक्तिचासमारंभ ॥

## दोहरा ४

करमबिनाकिन्हेपुरुख ग्यानलहेनहिकोय ॥
कियेसबनाससंन्यासकों दोऊमुगतनहोय ॥

## ओवी ४

जेकर्मारंभनकरिती ॥ तेपुरुषमोक्षनपावती ॥
कर्मेंउगींचत्यजिती ॥ तयांसिसिद्धीनाहीं ॥

## अभंग ४

जेकांकमातीत ॥ सिद्धप्राप्तचोखट ॥ १ ॥
परीकर्मकेल्यावीण ॥ कोणसीणमुकला ॥ २ ॥
कर्मसंन्यासमात्रें ॥ सिद्धीवक्रेंनपाहे ॥ ३ ॥
ययालागींतुकावाणी ॥ हेनिशाणीकर्माची ॥ ४ ॥

## श्लोक ५

नहिकश्चित्क्षणमपिंजातुतिष्ठत्यकर्मकृत् ॥
कार्यतेह्यवशःकर्मसर्वःप्रकृतिजैर्गुणैः ॥

## समश्लोकी ५

कर्मकेल्याविणेंकोणी कधींहीक्षणहीनसे ॥
दाटूनिकर्वितीकर्मैं सर्वप्रकृतिचेगुण ॥

## आर्या ५

कर्माविणकोणीही क्षणभरिपार्थानराहतांअवश ॥
करितोकर्मसदाही प्रकृतिगुणालागिहोउनीवश्य ॥

## दोहरा ५

करमकियेबिनछिनकहूं रहेनकोऊजंत ॥
बिबसमयेकरमनकरो बांधोमायातंत ॥

## ओवी ५

कोणीकर्महीननसती ॥ क्षणएककर्मेंसांडिती ॥
दाटूनियांकर्मकरविती ॥ प्रकृतीचेगुणजाण ॥

## अभंग ५

अहोकर्मकेल्यावीण ॥ वागेकोणपृथ्वीस ॥ १ ॥
एकपळनठरेकधीं ॥ कर्मसंधीवांचूनी ॥ २ ॥
हटेंछंदेंकरविती ॥ कर्मप्रकृतीयागुणें ॥ ३ ॥
तुकाह्मणेकर्मातीत ॥ त्याअनंतमानीना ॥ ४ ॥

## श्लोक ६

कर्मेंद्रियाणिसंयम्ययआस्तेमनसास्मरन् ॥
इंद्रियार्थान्विमूढात्मामिथ्याचारःसउच्यते ॥

## समश्लोकी ६

कर्मेंद्रियेंआवरोनी मनींविषयचिंतितो ॥
नेत्रलावीबसेमूढ तोदंभाचारबोलिजे ॥

## आर्या ६

कर्मेंद्रियांसिदमुनी विषयस्मरतोमनामधेंमूढ ॥
ह्मणतीत्यातेंज्ञानी मिथ्याचारीसदामहामूढ ॥

## दोहरा ६

करमबिद्रियनरोकिकें मनबिखयनकोंध्यान ॥
कपटीमूरखहैबडे ताकोंदंभीजान ॥

## ओवी ६

कर्मेंद्रियांतेंदंडी ॥ मनकल्पनानसांडी ॥
तयानाहींविषयांचीसांडी ॥ ह्मणोनिमूर्खह्मणावें ॥

## अभंग ६

कर्मेंद्रियाअनिवारा ॥ तोपसाराआवरूनी ॥ १ ॥
मनींचिंतीविषयांस ॥ कर्मसंन्याससाधुनी ॥ २ ॥
डोळेझांकीमूढवसे ॥ मिथ्यादिसेदंभतो ॥ ३ ॥
तुकाविनवितोसंतां ॥ ऐसीवार्त्ताजुनाट ॥ ४ ॥

## श्लोक ७

यस्त्विंद्रियाणिमनसानियम्यारभतेऽर्जुन ॥
कर्मेंद्रियैःकर्मयोगमसक्तःसविशिष्यते ॥

## समश्लोकी ७

अर्जुनाइंद्रियांतेंजो मनेंकरुनआवरी ॥
कर्मेंद्रियेंकर्मयोग करीनिष्कामथोरतो ॥

## आर्या ७

तोचिविशिष्टहिपार्था अंतःकरणेंदमोनियांकरणें ॥
कर्मेंद्रियेंचिज्याला त्यागुनिआसक्तिकर्मतेंकरणें ॥

## दोहरा ७

मनराखेंबिद्रियन कछुकर्मनरचाय ॥
फलअभिलाखकोंतजे वातेंयहअधिकाय ॥

ओवी ७

इंद्रियांदमनकरीस्वभावी ॥ इंद्रियांहातींकर्मकरवी ॥
कर्मफलाचीआशानधरावी ॥ तोचिश्रेष्ठह्मणिजेअर्जुना ॥

अभंग ७

अरेपार्थाइंद्रियांला ॥ मनेंत्यांलाआवरी ॥ १ ॥
कर्मेंद्रियींकर्मयोग ॥ करीनिःसंगथोरतो ॥ २ ॥
निष्कामाचेंजेंभजनें ॥ तुकाह्मणेविश्रांती ॥ ३ ॥

श्लोक ८

नियतंकुरुकर्मत्वंकर्मज्यायोह्यकर्मणः ॥
शरीरयात्रापिचतेनप्रसिद्ध्येदकर्मणः ॥

समश्लोकी ८

कर्मत्यागाहुनीकर्म श्रेष्ठतेंनित्यतूंकरी ॥
देहनिर्वाहहीतूझा नघडेकर्मटाकितां ॥

आर्या ८

कर्मबरेंनअकर्म स्वीकारीकर्मअवशमात्राही ॥
कर्मत्यजितांपार्था नचलेक्षणभरशरीरयात्राही ॥

दोहरा ८

अनकरणोतेंकरमहै भलेसुकृतकरोमीत ॥
बिनकिन्हेतेकरमकों देहजुवहेनीत॥

ओवी ८

वर्णाश्रमकर्मकरी ॥ कर्मश्रेष्ठहोअवधारी ॥
नकरितांकर्मत्यजिसीजरी ॥ देहअवसानींसिद्धिनाहीं॥

अभंग ८

कर्मत्यागाहुनिकर्म ॥ श्रेष्ठावर्मपानतें ॥ १ ॥

